"सहायक कक्ष अधिकारी" मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा-२०२२ मधील गुणवत्तेनुसार शिफारसप्राप्त उमेदवाराचे मंत्रालयीन विभागात नियतवाटप - श्री. शि.सं. गजबार.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांक : मविप १४२३/प्र.क्र.३३/१४-अ,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ११ एप्रिल, २०२३

**वाचा:-** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, जाहिरात क्रमांक: ०८६/२०२२, दि. २९-०९-२०२२.

२) म.लो.आ. क्र. १४४२ /सकअमविप/२०२२/२४, दिनांक ०३-०२-२०२३ चे पत्र.

## आदेश

मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/१०१७ च्या अंतिम न्याय निर्णयाचे अधिन राहुन **"सहायक कक्ष अधिकारी" मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा २०२२** अंतर्गत मंत्रालयीन विभागातील ६२ पदे ही गुणवत्तेनुसार भरण्याबाबतची जाहिरात महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत दि. २९-०९-२०२२ रोजी प्रसिध्द करण्यात आली होती.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक १०-१२-२०२२ रोजी सदर परीक्षा घेऊन, प्रस्तुत परीक्षेचा अंतिम निकाल आयोगाच्या संकेतस्थळावर दिनांक ०१-०२-२०२३ रोजी प्रसिध्द केला. आयोगाने संदर्भाधिन क्र. २ येथील पत्रान्वये दिव्यांग व्यक्तींकरिता आरक्षणासह ६२ उमेदवारांची शिफारस केली आहे. सामान्य प्रशासन विभाग, शासन आदेश क्रमांक : मविप १४२३/प्र.क्र.३३/१४-अ, दिनांक २३-०२-२०२३ अन्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या ६० उमेदवारांचे मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात आलेले आहे. सदर आदेशान्वये श्री.शि.सं.गजबार, यांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याने त्यांचे सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात आले नव्हते.

२.१ श्री.शि.सं. गजबार, लिपिक-टंकलेखक, गृह विभाग यांनी भटक्या जमाती (क) प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले असून आता त्यांचे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेले उमेदवार म्हणून मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून सहायक कक्ष अधिकारी पदावर **सोबतच्या परिशिष्ट-अ** नुसार नियतवाटप खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) | मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेली विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ च्या अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सहायक कक्ष अधिकारी पदावर पदस्थपना करण्यात येत आहे. |
| २) | श्री. गजबार यांच्याबाबत काही न्यायालयीन प्रकरणे/फौजदारी खटले/विभागीय चौकशी प्रलंबित असल्यास पदोन्नतीच्या पदावर कार्यमुक्त करण्यापूर्वी या बाबींची खातरजमा सदर उमेदवार सध्या ज्या विभागात कार्यरत आहेत (गृह विभाग) त्या विभागाने करावी. |

| | | |
|---|---|---|
| ३) | सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप केलेल्या उमेदवाराने दिनांक १०-०५-२०२३ (म.नं.) पर्यंत पदोन्नतीने पदस्थापना केलेल्या विभागामध्ये हजर व्हावे. श्री. गजबार यांना गृह विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे. संबंधित उमेदवाराने आपली सहायक कक्ष अधिकारी पदावरील पदस्थापना तात्काळ स्विकारावी. सदर पदोन्नती उपरोक्त नमूद कालावधीमध्ये स्विकारली नाही तर, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/कार्यासन-१२, दिनांक १२.०९.२०१६ अन्वये कार्यवाही करण्यात येईल. नियोजन विभागाला विनंती करण्यात येते की, उमेदवाराचे नेमणूकीचे आदेश लवकरात-लवकर निर्गमित करावेत. तसेच, श्री. गजबार यांनी किंवा गृह विभागाने श्री. गजबार यांना त्याच विभागात ठेवण्यासाठी स्वतंत्र टिप्पणी/प्रस्ताव सादर करु नये. | |
| ४) | श्री. गजबार हे विहित कालावधीत रूजू झाल्यास (दि. १०-०५-२०२३ (म.नं.) पर्यंत) त्यांची सेवाज्येष्ठता ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारसक्रमानुसार व म.ना.से. (सेवाज्येष्ठता) विनियमन २०२१ मधील तरतुदीनुसार निश्चित केली जाईल. | |
| ५) | संबंधित उमेदवाराची सहायक कक्ष अधिकारी पदावरील पदस्थापना ज्या विभागामध्ये करण्यात आली आहे, त्या विभागाने सहायक कक्ष अधिकारी, तसेच विक्रीकर निरीक्षक मर्यादित विभागीय परीक्षेकरीता आस्थापना अधिकारी किंवा कार्यालय/विभागाप्रमुख अधिकारी यांनी द्यावयाचे प्रमाणपत्र व त्याअनुषंगाने संबंधित कागदपत्रे पडताळणी करुन तसेच लहान कुटुंबाच्या प्रतिज्ञापनाचा नमुना/प्रमाणपत्र उपलब्ध करुन नियुक्ती आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्याने करावी. तसेच श्री. गजबार यांच्याबाबतीत खालील बाबींची तपासणी करण्याच्या अधीन राहून नियुक्ती आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी :- | |
| | अ) | उमेदवाराने लिपिक-टंकलेखक पदाची सेवाप्रवेशोत्तर परीक्षा विहित कालावधीत उत्तीर्ण केली आहे. |
| | ब) | *उमदेवाराचे जाती/जमातीचे दावे वैध ठरले आहेत.* |
| | क) | नियतवाटप करण्यात आलेल्या उमेदवाराबाबत काही न्यायालयीन प्रकरणे/ फौजदारी खटले/विभागीय चौकशी चालू अथवा प्रलंबित असल्यास नियुक्ती देण्यापूर्वी सदर बाबींची नियमानुसार तपासणी करुन संबंधित उमेदवारास नियुक्ती देण्यासंदर्भात कार्यवाही करणे आवश्यक आहे. असे असल्यास, उमेदवार सध्या ज्या विभागात कार्यरत आहेत, त्या विभागाने त्यांना कार्यमुक्त न करता तात्काळ सामान्य प्रशासन विभागाला कळवावे. |
| | ड) | नियतवाटप करण्यात आलेला उमेदवार, शासन अधिसूचना दिनांक ०१-०६-२०२२ नुसार अटींची पूर्तता करीत असल्याचे संबंधित विभागाने खात्री करावी, तद्नंतरच संबंधित उमेदवाराची सहायक कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती करण्यात यावी. |
| ६. | महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या गुणवत्तेनुसार ६२ उमेदवारांपैकी शिफारस यादीतील **अ.क्र.८ येथील श्री. शि.सं. गजबार, हे भ.ज. (क) प्रवर्गातील उमेदवार असून त्यांनी** | |

| | |
|---|---|
| | **आता जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले असल्याने** सदर उमेदवाराचे **सोबतच्या परिशिष्ट-अ** नुसार नियतवाटप करण्यात येत आहे. |
| ७. | महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने गुणवत्तेनुसार **"सहायक कक्ष अधिकारी" मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा २०२२** मधून शिफारस केलेल्या ६२ उमेदवारांच्या कोणत्याही कागदपत्रांची पडताळणी केलेली नाही, तथापि आयोगाने त्यांच्या दिनांक ०३-०२-२०२३ रोजीच्या शिफारस पत्रान्वये असे निदर्शनास आणून दिले की, "उमेदवारांनी ऑनलाईन पध्दतीने त्यांच्या अर्जात दिलेल्या माहितीच्या आधारे निकाल तयार करण्यात आला आहे. शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांची पदासाठीची पात्रता तसेच त्यांचे गोपनीय अभिलेख, दिव्यांग उमेदवारांबाबत त्यांची दिव्यांगत्वाची प्रमाणपत्रे शासन परिपत्रकात नमूद केलेल्या तरतुदीनुसार नियुक्तीपूर्वी तपासण्याच्या अधीन राहून त्यांची शासनाकडे शिफारस करण्यात येत आहे. शासन स्तरावर पात्रता तपासताना अपात्र ठरणाऱ्या उमेदवारांची शिफारस कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल, अशी सूचना उमेदवारांना पाठविण्यात आलेल्या शिफारस पत्रात नमूद करण्यात आली आहे." त्यानुसार सोबतच्या परिशिष्ठ-अ मध्ये नियतवाटप करण्यात आलेल्या उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत व ओळखपत्राची प्रत नियतवाटप केलेल्या विभागाला स्वतंत्रपणे उपलब्ध करून देण्यात येत आहेत. उमेदवाराने आवेदनपत्रामध्ये नमुद केलेल्या माहितीची (उदा. संपूर्ण नाव, जन्मदिनांक, शैक्षणिक अर्हता, जात प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र, सेवापुस्तकाच्या पहिल्या पानाची प्रत, अधिवास प्रमाणपत्र इ.) नियतवाटप केलेल्या विभागाने पडताळणी करून तद्नंतर संबंधित उमेदवारांचे सहायक कक्ष अधिकारी पदावरील नियतवाटप आदेश निर्गमित करावेत. |
| ८. | उमेदवार संदर्भाधीन क्र. १ येथील जाहिरातीतील सर्व अटींची पूर्तता करीत असल्याची नियुक्तीपूर्वी सखोल तपासणी उमेदवारांचे नियतवाटप केलेल्या संबंधित विभागातील नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी. |

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०४१११७३८२५९६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.04.11 17:44:08 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. शि.सं. गजबार, लिपिक-टंकलेखक ( गृह विभागामार्फत)

**प्रत,**

१) अ.मु.स.(गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) अ.मु.स.(नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) सह सचिव/उप सचिव (आस्थापना), गृह विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) निवड नस्ती/संग्रहार्थ (साप्रवि/कार्यासन १४-अ).

शासन आदेश क्रमांक: मविप १४२३/प्र.क.३३/१४-अ, दिनांक ११ एप्रिल, २०२३ सोबतचे परिशिष्ट "अ"

| अ.क्र. | श्री/ श्रीमती | कर्मचाऱ्याचे नांव | गुणवत्ता यादी नुसार गुणवत्ता क्रमांक | परीक्षेचे वर्ष | मलोआने ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | कर्मचाऱ्याचा जाती प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | श्री | शि.सं. गजबार | ८ | २०२२ | खुला | भज(क) | गृह विभाग | नियोजन विभाग |